**प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत रब्बी हंगाम सन २०२१-२२ साठी पिक विमा हप्ता अनुदानापोटी उर्वरीत राज्य हिस्सा विमा हप्ता रु. ३६,२८,८३,६८०/- इतकी रक्कम विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.४५/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०८ मार्च, २०२३.

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.४०/११- अे, दि.२९.०६.२०२० व दि.१७.०७.२०२०.
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.४५/११- अे, दि.०५.०५.२०२२ व दि.२६.०८.२०२२
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३ /अर्थ-३,दि.४.०४.२०२२.
४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी यांचे पत्र क्र. AIC.MRO / PMFBY-Rabbi २१/१२५६/२२, दि.१२.१२.२०२२.
५. संचालक (वि. प्र.) कृषि आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. सां.८/वि.ह.अनु./रब्बी-२१-२२ /१६९८/२०२२, दि.१७.०१.२०२३.

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०२० व रब्बी हंगाम २०२०-२१ पासून तीन वर्षाकरीता दि.२९.०६.२०२० व दि. १७.०७.२०२० च्या शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनी, इफ्को टोकिओ जनरल इन्शुरन्स कं. लि., रिलायंन्स जनरल इन्शुरन्स कं. लि., भारती ॲक्सा जनरल इन्शुरन्स कं. लि., बजाज अलियान्स इंशुरन्स कंपनी लि. व एचडीएफसी इर्गो इन्शुरन्स कं.लि या ६ विमा कंपन्यांमार्फत राबविण्यात येत होती. भारतीय कृषि विमा कंपनी ही राज्यात विमा कंपन्यांची समन्वयक कंपनी आहे. भारतीय कृषि विमा कंपनीने प्रधानमंत्री पिक विमा योजना रब्बी हंगाम २०२१-२२ अंतर्गत उपरोक्त ६ कंपन्यांचा एकत्रित मिळून पिक विमा हप्ता अनुदानापोटी उर्वरीत राज्य शासन हिस्सा अनुदानाची मागणी केलेली आहे. केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.१.११ नुसार प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत रब्बी हंगाम २०२१-२२ ची विमा हप्त्याची उर्वरीत राज्य हिस्सा रक्कम विमा कंपन्यांना दि.३१.०३.२०२३ अखेर अदा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (५) च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरून रु.३६,२८,८३,६८०/- इतकी रक्कम पिक विमा हप्ता अनुदानापोटी विमा कंपन्यांस अदा करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

भारतीय कृषि विमा विमा कंपनीने सादर केलेली मागणी, कृषि आयुक्तालयाची शिफारस आणि केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांमधील मुद्दा क्र. १३.१.११ या बाबींचा विचार करता प्रधानमंत्री पिक विमा योजना रब्बी हंगाम २०२१-२२ अंतर्गत पिक विमा हप्ता अनुदानापोटी उर्वरीत राज्य शासन हिस्सा अनुदानाच्या हप्त्यापोटी रु. ३६,२८,८३,६८०/- (अक्षरी रक्कम रु. छत्तीस कोटी अठ्ठाविस लाख त्र्याऐंशी हजार सहाशे ऐंशी फक्त) इतके अनुदान खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे .

**रब्बी हंगाम २०२१-२२**

| विमा कंपनी | एकूण देय राज्य हिस्सा विमा हप्ता रक्कम (रु) | विमा कंपन्यांना यापुर्वी वितरीत राज्य हिस्सा अनुदान (रु.) | वितरीत करण्यात येणारी राज्य हिस्सा रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| भारतीय कृषि विमा कंपनी | २१४४६६७६३५ | १७८५८८४२७४ | ३४७४१७४७२ |
| आयसीआयसीआय लोंबार्ड ज. इं. | १४२२८२२६२ | १३८५८६६०९ | १०२५२८१ |
| इफ्को टोकीओ जनरल इं. कं. लि. | २९५५८९८९२ | २९३८१५९८९ | ० |
| रिलायन्स जनरल इं.कं.लि | ४५९५६९०८५ | ४५७२६५५४७ | २१०१५६२ |
| एचडीएफसी इर्गो जनरल इं.कं.लि. | १२६८२७६५४ | १२१५३०९१३ | ४८७४३२८ |
| बजाज अलियांन्झ जनरल इं.कं.लि. | २५५६५९४४६ | २४७११५२९३ | ७४६५०३७ |
| **एकूण रब्बी हंगाम २०२१-२२** | **३४२४५९५९७४** | **३०४४१९८६२५** | **३६२८८३६८०** |

२. सदरची रक्कम रब्बी हंगाम २०२१-२२ करीता वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर यापुर्वीच्या इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर, ३३- अर्थसहाय्य.**

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनां व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयानुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौप संदर्भ क्र.४१/२०२३/व्यय-१, दि.१०.०२.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०८१८३४५५०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.03.08 18:38:56 +05'30'

**सरिता बांदेकर- देशमुख**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
११. सह सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१३. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, नवीन स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
१४. विभागीय व्यवस्थापक, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंश्शुरन्स कं.लि., आयसीआयसीआय हाऊस, ४१४, वीर सावरकर मार्ग, सिध्दीविनायक मंदिराजवळ, प्रभादेवी, मुंबई- ४०० ०२५.

१५.विभागीय व्यवस्थापक, रिलायन्स जनरल लिमिटेड, वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, ५ वा मजला, चिंतामणी अव्हेन्यू, विराणी औद्योगिक वसाहती जवळ, गोरेगाव (ई) मुंबई ४०००२३.

१६.विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी इगों इंन्शुरन्स कं. लि. डी-१०३ तीसरा मजला ईटन बिझनेस, डिस्ट्रीक्ट एल.एस.बी. मार्ग भांडूप (पश्चिम), मुंबई-४०००७८

१७.विभागीय व्यवस्थापक, बजाज अलियान्झ जनरल इंशुरंस कं. लि. कॉमरझोन १ ला मजला, टॉवर १ समर्थ अशोक मार्ग, येरवडा पुणे-४११००६

१८. विभागीय व्यवस्थापक, इफ्को टोकीओ जनरल इन्शुरन्स कंपनी, लिमिटेड, ६ वा मजला, सुयोग प्लॅटीनम, मंगलदास रोड, पुणे-४११००१.

१९.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).